ई - निविदा प्रणाली अंतर्गत अल्प कालावधीची निविदा सूचना प्रसिद्ध करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन आदेश क्रमांकः** निविदा-२०२१/प्र.क्र.१३/बांध-४

५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१

तारीख : २१ मे, २०२५

वाचा :

१. **शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांकः** संकीर्ण २०१०/ प्र.क्र.१७२/पंरा-७, दिनांक १९ ऑक्टोबर, २०११.

२. **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** निविदा २०१२/प्र.क्र.९७/पंरा-७, दिनांक २३ सप्टेंबर, २०१३.

३. **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** निविदा २०१६/प्र.क्र.१९५/पंरा-७, दिनांक २६ जुलै, २०१६.

४. **शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक :** संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१०४/इमा-२, दिनांक १४ फेब्रुवारी, २०२५.

५. **शासन आदेश, ग्राम विकास विभाग समक्रमांकः**दिनांक ०१ ऑक्टोबर, २०२४

**शासन आदेश :**

दिनांक ०१ जानेवारी, २०१२ पासून पंचायत राज संस्थांमध्ये विविध विकासात्मक कामे व विकास कामांसाठी लागणाऱ्या सेवा तथा वस्तुंची खरेदी यासाठी ई-निविदा कार्यप्रणालीचा अवलंब करणे संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये बंधनकारक करण्यात आले आहे. ई - निविदा प्रणाली अंतर्गत सुधारित कार्यपद्धती व निविदा सूचनेचा कालावधी संदर्भ क्रमांक २ व ३ येथील शासन निर्णयान्वये विहित करण्यात आला आहे. आगामी आषाढी एकादशी निमित्त राज्यातील भाविक मोठ्या प्रमाणात पंढरपुर (जि. सोलापूर) या ठिकाणी वारीनिमित्त येत असतात. त्या अनुषंगाने सातारा, सोलापूर व पुणे या जिल्ह्यातील पालखी वारी मार्गातील अत्यावश्यक मुलभूत पायाभुत सुविधा व रस्ते तसेच इतर अनुषांगिक कामे विहित मुदतीत व पावसाळ्यापूर्वी पुर्ण करण्याकरिता संदर्भीय क्र. ०४ येथील सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णयानुसार अल्पकालावधीच्या ई-निविदे संदर्भात उपरोक्त तीन जिल्ह्यांना सूचना देण्याची बाब विचाराधीन आहे.

**०२.** उपरोक्त बाब विचारात घेता या शासन आदेशान्वये पालखी वारीच्या अनुषंगाने करावयाच्या सुविधांकरीता प्रसिद्ध करावयाच्या निविदांसाठी, ई - निविदा प्रणाली अंतर्गत अल्प कालावधीची ई - निविदा सूचना प्रसिध्द करण्याचा कालावधी **दिनांक १० जुलै, २०२५ पर्यंत** खालीलप्रमाणे राहिल.

| अ.क्र. | कामाच्या निविदेची किंमत | निविदा सूचना क्रमांक व कालावधी | | |
|---|---|---|---|---|
| | | प्रथम | द्वितीय | तृतीय |
| १ | रू.१.५ कोटी पेक्षा कमी | ८ दिवस | ४ दिवस | ३ दिवस |
| २ | रू. १.५ कोटी ते २५ कोटी | ८ दिवस | ४ दिवस | ३ दिवस |
| ३ | रू.२५ कोटी ते १०० कोटी | १५ दिवस | ७ दिवस | ३ दिवस |
| ४ | रु.१०० कोटी पेक्षा जास्त | २१ दिवस | ११ दिवस | ३ दिवस |

**०३.** सदर आदेश मुख्य कार्यकारी अधिकारी, **जिल्हा परिषद, सातारा, सोलापूर व पुणे** यांनी त्यांच्या अधिनस्त सर्व खाते प्रमुख, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था तसेच लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या ग्रामीण मुलभूत सुविधा पुरविणे (२५१५ १२३८) या अंतर्गतची तसेच इतर पालखी वारीच्या अनुषंगाने कामे ज्या ठिकाणी सार्वजनिक बांधकाम मंडळ यांच्या अधिनस्त यंत्रणा कार्यरत असेल अशा यंत्रणांच्या निदर्शनास आणून उपरोल्लेखित कामे मुदतीत पुर्ण होतील याची दक्षता घ्यावी. **सदर सवलत ही फक्त पालखी वारीच्या अनुषंगाने करावयाच्या सुविधांकरीता लागू राहील.** दिनांक ११ जुलै, २०२५ पासून ही सवलत आपोआप रद्द होऊन, संदर्भीय शासन निर्णय दिनांक २३ सप्टेंबर, २०१३ व दिनांक २६ जुलै, २०१६ मधील या संदर्भातील तरतूदी पुन:श्च लागू होतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२११७४८२५७६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2025.05.21 18:26:31 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२. प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.

३. सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा, सोलापूर व पुणे.
७. मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), म. ग्रा. र. वि. सं., पुणे.
८. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा, सोलापूर व पुणे.
९. अधिक्षक अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.) महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था. पुणे विभाग, पुणे.
१०.अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, यंत्रणा, पुणे विभाग, पुणे.
११.प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सातारा, सोलापूर व पुणे.
१२.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा, सोलापूर व पुणे.
१३.कार्यकारी अभियंता (बांधकाम, लघुपाटबंधारे, पाणी पुरवठा विभाग), जिल्हा परिषद, सातारा, सोलापूर व पुणे.
१४.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा, सोलापूर व पुणे.
१५. कार्यकारी अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.) महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सातारा, सोलापूर व पुणे.
१६.ग्राम विकास विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने.
१७.निवडनस्ती कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.